जल जीवन मिशन अंतर्गत राज्यस्तरावर व जिल्हास्तरावर नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमि- २०२३/प्र.क्र.१९२(अ)/पापु-१०**
**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१**
**तारीख: १३/०६/२०२३.**

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४ सप्टेंबर, २०२०.
२) शासन निर्णय क्रमांक जजीमि-०१२०/प्र.क्र.६५/पापु-०७, दिनांक ०४ नोव्हेंबर, २०२०
३) राज्य पाणी व स्वच्छता मिशनचे पत्र क्र. पावस्वससं/वासो ०८/प्र.क्र. १३/५६७ दि. १७/०४/२०२३

**प्रस्तावना**

सन २०१९ पासून राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाची पुनर्रचना करुन केंद्र शासन पुरस्कृत जल जीवन मिशनची सुरवात करण्यात आली आहे. जल जीवन मिशनबाबत केंद्र शासनाने दि. २५.१२.२०१९ रोजी प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन हा केंद्र पुरसकृत कार्यक्रम असुन त्यांतर्गत निधी वितरणाचे प्रमाण केंद्र हिस्सा ५० टक्के व राज्य हिस्सा ५० टक्के याप्रमाणे आहे. संदर्भाधीन क्र. (१) व (२) येथील शासन निर्णयान्वये जल जीवन मिशन अंतर्गत राज्यस्तरावर राज्य पाणी स्वच्छता मिशनसाठी ३९ पदे तर जिल्हास्तरावर जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकरिता १३६ पदांना मंजूरी देण्यात आली असून या प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन/भत्ते १००% राज्य हिश्श्यातून करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सबब, जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी व कर्मचा-यांच्या वेतन/भत्ते याकरीता आवश्यक निधी आहरित करण्याकरीता राज्यस्तरावर व जिल्हास्तरावर आहरण व संवितरण अधिकारी तसेच, नियंत्रक अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, जल जीवन मिशन या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमाअंतर्गत कार्यरत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी व कर्मचा-यांच्या वेतन/भत्ते याकरीता आवश्यक निधी आहरित करण्याकरीता महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील तरतुदीनुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासुन राज्यस्तरावर व जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहेत.

राज्यस्तरावर - लेखा अधिकारी, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन॰ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर - मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन) यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

तसेच, जिल्हास्तरावर (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळता इतर ३४ जिल्ह्यांमध्ये) - प्रकल्प व्यवस्थापक आर्थिक (लेखा अधिकारी), जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन यांना आहरण व संवितरण अधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ११६/२०२३/कोप्र-५ दि. ०९/०५/२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१२३३४२९८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.06.14 17:57:07 +05'30'

**( श्री. प्रसाद स्वामी )**
**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा/मा.सभापती विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
४. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
५. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा, मुंबई
६. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन, बेलापूर
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. जिल्हाधिकारी (सर्व)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१०.सह संचालक (वित्त), जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर
११. लेखा अधिकारी (जल जीवन मिशन), जिल्हा परिषद, (सर्व)
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, (सर्व)
१३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१५. मुख्य अभियंता तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
१६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग - कार्यासन पापु ०४.
१७. निवडनस्ती पापु-१०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-०१.